म्हाडा सरळसेवा भरती-२०२१ प्रक्रिया पार पाडण्याकरीता नेमणूक केलेल्या मे. जीए सॉफ्टवेअर टेक्नॉलॉजीस प्रा. लि. या कंपनीस काळ्या यादीत अंतर्भुत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृहनिर्माण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-२०२१/प्र.क्र.२१४/गृनिभू**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
३ रा मजला, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ०३ मार्च, २०२२.

**वाचा:-**

१) सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्र.प्रानिमं १२२०.क्र.प्र/२१/१३-अ, दि१७.०८.२०.२०

२) सामान्य प्रशासन विभाग (माहिती तंत्रज्ञान), शासन निर्णय क्र.मातंस-२०२०/प्र.क्र.११/से-२/३९, दि.२१.०१.२०२१

**प्रस्तावना:-**

म्हाडा प्राधिकरणाच्या आस्थापनेवरील गट अ ते गट ड संवर्गातील सरळसेवा कोट्यातील रिक्त पदे भरण्याची प्रक्रीया पार पाडण्याकरीता बाह्य एजन्सीची निवड करण्यात येते. सामान्य प्रशासन विभागाच्या उपरोक्त संदर्भ क्र.१ मध्ये नमूद दि.१७.०८.२०२० रोजीच्या परिपत्रकानुसार भुतपूर्व दुय्यम सेवा निवड मंडळांच्या कार्यकक्षेतील (महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कक्षेबाहेरीत) गट-ब (अराजपत्रित) व गट-क पदे सरळसेवेने भरताना महापरीक्षा पोर्टल पध्दतीत बदल करून सुधारीत परीक्षा पध्दतीचा वापर करण्याबाबत सूचना निर्गमित केल्या आहेत.

तसेच, सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भ क्र.२ येथील दि.२१.०१.२०२१ रोजीच्या शासन निर्णयानुसार महापरीक्षा पोर्टल अंतर्गत घेण्यात येणाऱ्या परीक्षा पध्दतीत आवश्यक बदल करून सुधारीत परीक्षा पध्दतीनुसार सर्व्हिस प्रोव्हायडरची निवड करून Empanel करण्याची कार्यवाही महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळ, मुंबई (महाआयटी) यांच्याकडून करण्यात आली होती. त्यानुसार त्यांनी RFP प्रसिध्द करून निविदा प्रकीयेद्वारे खाली नमूद ४ OMR VENDOR यांची निवड केली होती :-

१.मेसर्स ॲपटेक लिमिटेड (M/s.Aptech Limited)
२.मेसर्स जीए सॉफ्टवेअर टेक्नॉलोजी प्रायव्हेट लिमिटेड (M/s.GA Software Technologies Pvt.Ltd)
३.मेसर्स जींजर वेब्ज प्रायव्हेट लिमिटेड (M/s Ginger Webs Pvt.Ltd.)
४.मेसर्स मेटा आय टेक्नॉलोजी प्रायव्हेट लिमिटेड (M/s META-I Technologies Pvt.Ltd)

मंत्रालयीन प्रशासकीय विभाग व त्याच्या अधिपत्याखालील शासकीय कार्यालयांनी सुधारित परीक्षा पध्दतीनुसार पदभरतीबाबतची कार्यवाही शासनाने पॅनेलवर नियुक्त केलेल्या वरील कंपन्यांकडून करणे बंधनकारक असल्याने उपरोक्त नमूद OMR VENDOR पैकी अ.क्र. २ येथे नमूद मेसर्स जीए सॉफ्टवेअर टेक्नॉलोजी प्रायव्हेट लिमिटेड (M/s.GA Software Technologies Pvt. Ltd) या संस्थेची म्हाडा आस्थापनेवरील सरळसेवा कोट्यातील रिक्त पदे भरण्याकरीता निवड करण्यात आली.

सदर परीक्षा दि. १२.१२.२०२१ ते दि.२०.१२.२०२१ या कालावधीत घेण्यात येणार होती. तथापि, दि.११.१२.२०२१ रोजी नियोजित म्हाडाच्या परीक्षेबाबत मेसर्स जीए सॉफ्टवेअर टेक्नॉलोजी प्रायव्हेट लिमिटेडचे संचालक डॉ. प्रितेश देशमुख यांनी गोपनियतेचा भंग केल्याप्रकरणी श्री. देशमुख यांना दि.११.१२.२०२१ रोजी संध्याकाळी सायबर पोलीस, पुणे यांनी अटक करून त्यांच्यावर फौजदारी गुन्हा दाखल केला. सदर घटना प्रथम टप्प्यातील परीक्षेच्या काही तास आधी घडली असल्याची बाब विचारात

घेऊन तसेच, परीक्षा प्रक्रियेतील पारदर्शकता ठेवण्यासाठी दि.१२.१२.२०२१ रोजी होणारी व त्यापुढील परीक्षा रद्द करण्याचा निर्णय घेण्यात आला. मेसर्स जीए सॉफ्टवेअर टेक्नॉलोजी प्रायव्हेट लिमिटेड यांचेकडून म्हाडा पदभरतीचे महत्त्वाचे काम हे सचोटी व निष्ठेने पूर्णत्वास न गेल्याने त्यांच्या सोबत असलेला सामंजस्य करार मोडीत काढण्याचा निर्णय प्राधिकरणाने घेतला. म्हाडातील पदभरतीच्या कार्यवाहीत मेसर्स जीए सॉफ्टवेअर टेक्नॉलोजी प्रायव्हेट लिमिटेड यांनी दाखविलेल्या अक्षम्य निष्काळजीपणामुळे म्हाडाच्या प्रतिमेस तडा गेल्याने जनमानसात व उमेदवारांमध्ये सदर भरतीबाबत संभ्रम व रोष निर्माण झाल्याने मे. जीए सॉफ्टवेअर टेक्नॉलॉजीस प्रा. लि. कंपनीस कायमस्वरूपी काळ्या यादीत समाविष्ट करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. या पार्श्वभूमीवर शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे:-

**<u>शासन निर्णय:-</u>**

म्हाडा प्राधिकरणाच्या आस्थापनेवरील गट अ ते गट ड संवर्गातील सरळसेवा कोट्यातील ५६५ रिक्त पदभरतीच्या कार्यवाहीत मेसर्स जीए सॉफ्टवेअर टेक्नॉलोजी प्रायव्हेट लिमिटेड यांनी दाखविलेला अक्षम्य निष्काळजीपणा, केलेला गोपनीयतेचा भंग, अनैतिक व बेकायदेशीर कृत्यामुळे म्हाडाची झालेली बदनामी विचारात घेता मेसर्स जीए सॉफ्टवेअर टेक्नॉलोजी प्रायव्हेट लिमिटेड, ७४, तिसरा मजला, प्रेस्टीज फेरोझ बिल्डिंग, कॅनिंगहम रोड, वसंत नगर, बंगळूरु - ५६० ०५२ या कंपनीस तसेच, सदर कंपनीवर असलेल्या संचालकांना कायमस्वरूपी काळ्या यादीत समाविष्ट करण्यात येत आहे.

गृहनिर्माण विभागाच्या अधिनस्त कार्यालयांनी मेसर्स जीए सॉफ्टवेअर टेक्नॉलोजी प्रायव्हेट लिमिटेड या कंपनीशी कोणत्याही प्रकारच्या परीक्षेसंदर्भात करार/कार्यवाही करण्यात येणार नाही, याची दक्षता घ्यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या <u>www.maharashtra.gov.in</u> या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०३०३१६५७२४७५०९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

LEMBHE ADITI ASHOK

Digitally signed by LEMBHE ADITI ASHOK
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOUSING DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ceb5712400e1116fd269899721525355fdff0f1c9e88083ec7c5989cd8012199, pseudonym=B49A5EA513466592434F08BAF3686D085B1EF743, serialNumber=990DB0BB526B1091666DA553E7E0E30BE26640A64E18C3EA2EF4825D35D8EBC1, cn=LEMBHE ADITI ASHOK
Date: 2022.03.03 16:59:42 +05'30'

**(अदिती लेंभे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
२. मा. मंत्री (गृहनिर्माण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
३. मा. राज्यमंत्री (गृहनिर्माण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
४. प्रधान सचिव (गृहनिर्माण), गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
५. प्रधान सचिव, सामान्य प्रशासन विभाग (माहिती तंत्रज्ञान), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
६. उपाध्यक्ष तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्र विकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई-४०० ०५१.
७. मुख्य कार्यकारी अधिकारी, झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण, वांद्रे (पुर्व), मुंबई-५१
८. सर्व उप सचिव/अवर सचिव, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
९. सचिव, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, वांद्रे (पुर्व) मुंबई-५१.
१०. निवड नस्ती (गृनिभू कार्यासन) , गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई.